कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.
कै.शरद सुखलाल तेली, कनिष्ठ लिपिक

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकावियो-२०२२/प्र.क्र.३२७/सेवा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २७ मे, २०२४

**वाचा :-** १) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. २९.०५.२०२०
२) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. १४.०५.२०२१
३) संचालक (प्रशासन), राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्र.आयुक्त/राकावियो/वर्ग-३/सानुग्रह/सहाय्य/का.क्र.२/१२५९६-९८/२०२२, दि.१९.०५.२०२२

**शासन निर्णय :**

वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोविड - १९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोविड - १९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांनी कै.शरद सुकलाल तेली, कनिष्ठ लिपिक यांच्या कुटुंबियांना वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. २९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१ अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, पुणे येथे कार्यरत असलेले कै.शरद सुखलाल तेली, कनिष्ठ लिपिक यांचा कोविड - १९ संबंधित कर्तव्य पार पाडताना कोरोना विषाणू संसर्गाने दि. ०९.०३.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे. त्यांच्या सेवा कोविड - १९ विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने मदतकार्य यामध्ये समाविष्ट होत आहेत. तसेच त्यांचा मृत्यृ कोविड - १९ मुळे झाला असल्याचे मुख्याधिकारी पाचोरा यांनी प्रमाणित केले आहे.

४. त्यानुसार वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, पुणे अंतर्गत सेवा दवाखाना क्रमांक - २, जळगाव येथे कार्यरत असलेले कै.शरद सुखलाल तेली, कनिष्ठ लिपिक

यांच्या कुटुंबियांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेचे सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास या आदेशाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

५. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि. २९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१ मधील तरतुदीनुसार कै.शरद सुखलाल तेली, कनिष्ठ लिपिक या कर्मचाऱ्याच्या वारसास या संदर्भातील तरतुदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांची राहील.

६. प्रस्तुत खर्च "मागणी क्रमांक आर - १, मुख्य लेखाशिर्ष २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, १०२-राज्य कामगार विमा योजना (१) मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील राज्य कामगार विमा (१) (२)-वैद्यकीय प्रशासन अधिकारी कार्यालय रा.का.वि.यो. (२२१०१३८५) (योजनेत्तर), ०१-वेतन" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून,त्याचा संकेतांक २०२४०५२७१२३००५३२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Mahesh Madhukar Lad

Digitally signed by Mahesh Madhukar Lad
DN: cn=Mahesh Madhukar Lad, o, ou, email=mahesh.lad@nic.in, c=US
Date: 2024.05.27 15:00:14 +05'30'

**( महेश म. लाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, लोअर परेल, मुंबई.
३. संचालक (प्रशासन),राज्य कामगार विमा योजना,लोअर परेल,मुंबई.
४. वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना, पुणे
५. प्रभारी वैद्यकीय अधिकारी, राज्य कामगार विमा योजना सेवा दवाखाना क्र.२, जळगाव
६. जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई/पुणे/जळगाव.
७. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/पुणे/जळगाव.
८. श्रीमती रेखा शरद तेली, प्लॉट नं.५, घर नं.५, व्हाईट हाऊस, राधेशाम कॉलनी, शिरसोली रोड, जळगांव.
९. निवड नस्ती सेवा-१.